सन २०२३-२४ मध्ये मा.बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण प्रकल्पा करिता रु.६०.०० कोटी निधी वितरीत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**कृषी,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृव्यप्र ५४२३/प्र.क्र. ९३/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२
दिनांक- १८ मे, २०२३

**वाचा:-**

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक:- कृव्यप्र - ४६१८/प्र.क्र.१०२/८-अे, दि.१९.०१.२०१९
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक:- कृव्यप्र - ४६१९/प्र.क्र.७०/८-अे, दि. ११.०९.२०१९
३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक:- कृव्यप्र - ४६१९/प्र.क्र.७०/८-अे, दि. ११.०९ २०१९
४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक:- कृव्यप्र - ४६१९/प्र.क्र.७९/८-अे, दि. १४.०२.२०१९
५. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि व ग्रामीण परिवर्तन (SMART) प्रकल्प, यांचे पत्र क्रमांक स्मार्ट/पीसीएमयु/लेखा/बजेट २०२३-२४/७६८/२०२३, दिनांक २७.४.२०२३

**प्रस्तावना:-**

मा.बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन प्रकल्पाची (State of Maharashtra's Agribusiness and Rural Transformation - SMART) राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये (सन २०१९-२० ते २०२६-२७) या ७ वर्षाच्या कालावधीत अंमलबजावणी करण्यात येत आहे.

या प्रकल्पासाठी सन २०२३-२४ या वर्षात रु. ३००.०० कोटी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. प्रकल्प संचालकांनी संदर्भ क्रमांक ५ येथील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन प्रकल्पाकरिता सन २०२३-२४ मध्ये एप्रिल ते जून २०२३ या पहिल्या तिमाहीसाठी विविध बाबींच्या अंमलबजावणीसाठी वित्त विभागाने दिलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीच्या २०% मर्यादेत बाह्य हिश्श्याचा रु. ४२.०० कोटी व राज्य हिश्श्याचा रु.१८.०० कोटी याप्रमाणे एकूण रु.६०.०० कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे-

**शासन निर्णय : -**

१. सन २०२३-२४ करिता प्रकल्प संचालक, मा.बाळासाहेब ठाकरे कृषि व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प यांना प्रकल्पांतर्गत विविध बाबींची अंमलबजावणी करण्याकरिता बाह्य हिश्श्याचा बाह्य हिश्श्याचा रु. ४२.०० कोटी (रु. बेचाळीस कोटी फक्त) व राज्य हिश्श्याचा रु.१८.०० कोटी (रु. अठरा कोटी फक्त) याप्रमाणे एकूण रु.६०.०० कोटी (रुपये साठ कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यात येत असून त्याचा बाबनिहाय तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | उद्दिष्ट शीर्ष | बाह्य हिश्याकरिता वितरीत करावयाचा निधी २४०१A९६९ | राज्य हिश्याकरिता वितरीत करावयाचा निधी २४०१A९५१ |
|---|---|---|---|
| १ | **३१-सहायक अनुदाने** | १४.७६ | ६.३३ |
| २ | **३३-अर्थसहाय्य** | २७.२४ | ११.६७ |
| | **एकूण** | ४२.०० | १८.०० |

२. उपरोक्त प्रमाणे वितरीत रु.६०.०० कोटी निधी प्रकल्पाच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

| **बाह्य हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
|---|---|
| मागणी क्र. डी-३<br>२४०१-पीक संवर्धन<br>(११५) लहान/सीमांत शेतकरी व कृषि मजूरांसाठी योजना<br>(००) (०५) **मा. बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परीवर्तन प्रकल्प (बाह्य हिस्सा ७२.४१%)**<br>(२४०१ A९६९) ३१-**सहायक अनुदाने**<br>३३-अर्थसहाय्य | मागणी क्र. डी-३<br>२४०१-पीक संवर्धन<br>(११५) लहान/सीमांत शेतकरी व कृषि मजूरांसाठी योजना<br>(००) (०४) मा. बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परीवर्तन प्रकल्प (राज्य हिस्सा २७.५९%)<br>(२४०१A९५१) ३१-सहायक अनुदाने<br>३३-अर्थसहाय्य |

३. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या बाह्य हिश्श्याकरिता रु.४२.०० कोटी (रुपये बेचाळीस कोटी फक्त) व राज्य हिश्श्याकरिता रु. १८.०० कोटी (रुपये अठरा कोटी फक्त) अशा एकूण रु. ६०.०० कोटी (रुपये साठ कोटी फक्त) इतक्या निधीच्या कोषागारातून आहरण व वितरणाकरिता प्रकल्प संचालक, मा.बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प (SMART) संस्था, पुणे यांना नियंत्रण अधिकारी आणि वित्त विशेषज्ज्ञ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा विहीत पध्दतीने तात्काळ विनियोग करण्यात यावा प्रकल्प संचालकांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. प्रकल्प संचालकांनी सदर प्रकल्पांतर्गत खर्ची पडणाऱ्या निधीची जागतिक बँकेकडून सत्वर प्रतिपूर्ती मिळवावी व मिळालेल्या प्रतिपूर्तीबाबत शासनास वेळोवेळी अहवाल पाठवावा.

६. संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयातील सर्व अटींचे काटेकोरपणे पालन होईल याची प्रकल्प संचालकांनी दक्षता घ्यावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाकित दि. १२ एप्रिल, २०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन तसेच नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. १३३/२०२३/व्यय-१ दि.१६.५.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mahaashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५१८१७४६००१३०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.05.19 14:59:05 +05'30'

**( संतोष कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री ( कृषि), मंत्रालय, मुंबई-३२

२. सर्व सन्माननीय विधी मंडळ सदस्य ,द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. अतिरिक्त मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अतिरिक्त मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (सहकार व पणन), सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (नगर विकास), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (महिला व बाल विकास), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
११. आयुक्त (कृषि), आयुक्त कार्यालय, पुणे
१२. प्रकल्प संचालक, मा.बाळासाहेब ठाकरे कृषि व्यवसाय व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. आयुक्त, सहकार, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. आयुक्त, पुणे महानगर पालिका, पुणे
१६. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ, नागपूर
१८. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, मुंबई
१९. संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, पुणे
२०. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
२१. व्यवस्थापकीय संचालक, ग्राम सामाजिक परिवर्तन फाऊंडेशन, मुंबई
२२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकार विकास महामंडळ, मुंबई
२३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे
२४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, मुंबई
२५. मुख्य कार्यकारी अधिकारी, ग्राम सामाजिक परिवर्तन फाऊंडेशन, पुणे
२६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
२७. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
२८. सह संचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई ३२
२९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/ निवासी लेखा अधिकारी, मुंबई
३०. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई ३२.
३१. निवडनस्ती (८-अे).